अर्थसंकल्प/संगणक कार्यासन यांच्या अर्थसंकल्पीय कामकाजाकरीता **HP LaserJet Enterprise M608dn** प्रिंटर खरेदी करण्यास वित्तीय व प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## वित्त विभाग
## शासन निर्णय क्रमांक:- सीओएम-२०१८/प्र.क्र.१०/संगणक कक्ष

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
दिनांक :-०२.०१.२०१९

**संदर्भ - १) वित्त विभाग, अर्थसंकल्प-३ कार्यासनाची दि.२९.११.२०१८ ची टिप्पणी.**
**२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय दि.०१.१२.२०१६.**

**शासन निर्णय :-**

वित्त विभागाच्या अर्थसंकल्प शाखेसाठी अर्थसंकल्पीय कामकाजासाठी स्वतंत्र असा संगणक कक्ष असून तेथे अर्थसंकल्प विषयक संविधानिक, गोपनिय स्वरूपाचे कामकाज करण्यात येते. सदर कामकाज विहित कालमर्यादेत पूर्ण करून ते विधानमंडळास सादर करावे लागते. त्यामुळे संगणक कक्षातील यंत्रसामुग्री अद्ययावत व सुस्थितीत कार्यरत असणे आवश्यक आहे. सध्या अर्थसंकल्प संगणक शाखेकडे असेलेल HP-5200 हा प्रिंटर २००७ पासुन व TASkalfa 3500i हा प्रिंटर २०१३ पासून कार्यरत आहे. सदर प्रिंटर जुने झाले असुन ते वारंवार नादुरूस्त होत आहेत. ही बाब लक्षात घेता वित्त विभाग/अर्थसंकल्प -३ कार्यासनाने दि.२९.११.२०१८ च्या टिप्पणीन्वये HP LaserJet Enterprises M608 dn (KOQ18A) किंवा HP LaserJet Enterprises M609 dn (KOQ21A) यापैकी एक प्रिंटर उपलब्ध करून द्यावा, असे कळविले होते.

सदरच्या अनुषंगाने विविध पुरवठादारांकडून दोन्ही प्रिंटरचे दरपत्रक मागविण्यात आले होते. दरपत्रक प्राप्त झाल्यानंतर HP LaserJet Enterprises M608 dn (KOQ18A) प्रिंटर उपलब्ध करून द्यावा, असे अभिप्राय अर्थसंकल्प-३ कार्यासनाने या कार्यासनाच्या टिप्पणीवर दि.२९.१२.२०१८ रोजी दिले आहेत. सदर HP LaserJet Enterprises M608 dn (KOQ18A) प्रिंटर खाली नमुद केलेल्या Configuration प्रमाणे खरेदी करण्यात येत आहे.

| Sr.No. | Printer Specification | HP LaserJet Enterprise M608dn |
|---|---|---|
| 1 | Printing Technology | Laser |
| 2 | Cartridge Technology | composite |
| 3 | Type of printing | mono |
| 4 | Paper Size | A4 |
| 5 | Print Speed (A4) - Mono (PPM) | 65 |
| 6 | Resolution (Dpi) | 1200 x 1200 dpi |
| 7 | Memory (MB) | 512 |
| 8 | Processor Speed (Mhz) | 1200 |
| 9 | Duplexing Feature | yes |
| 10 | Network Connectivity | yes |
| 11 | Network Interface, if available | Ethernet 10/100/1000 |
| 12 | Wireless Connectivity | yes |

| | | |
|---|---|---|
| 13 | USB Port | yes |
| 14 | Paper Tray Capacity | 650 |
| 15 | Number of Paper Trays | 2 |
| 16 | Yield of Cartridge/Ink Tank/Ink Pack supplied with printer(Per Set) | 11000 |
| 17 | Duty Cycle /month (No of Prints) | 275000 |
| 18 | On site OEM warranty (Years) | 3 |

२. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक -विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७/०४/२०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग-१, उपविभाग-२, अनुक्रमांक-२७-अ, नियम क्रमांक-७६ अन्वये नवीन संगणक यंत्रणा खरेदी करणे आणि श्रेणीवाढ करण्यास मंजूरी देणे यासाठी पूर्ण अधिकार प्रशासकीय विभागाला देण्यात आले आहेत.

३. सदर प्रिंटर खरेदीची प्रक्रिया उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दि.०१/१२/२०१६ मधील तरतुद क्र.३.२.३ अन्वये खरेदी प्रक्रीया राबविण्यात येत आहे. त्या तरतुदीनुसार L१ निविदाकार म्हणून मे.आर. एम. इंटरप्रायजेस हे निविदाकार पात्र ठरलेले आहेत. HP LaserJet Enterprises M608 dn) KOQ18A) प्रिंटरची एकूण किंमत त्यांनी रूपये १,३०,९८०/- इतकी नमुद केली आहे. सदर L१ निविदाकाराकडून प्रिंटर खरेदी करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४. या कारणाकरीता होणारा एकूण खर्च रूपये १,३०,९८०/- हा मागणी क्रमांक जी-४, २०५२, सेक्रेटरीएट सर्वसाधारण सेवा, (००)(०१) वित्त विभाग (२०५२ ०२३२ ), "१७ संगणकावरील खर्च" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०१८-२०१९ या वित्तीय वर्षाच्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

५. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१९०१०२१७१८५११२०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ravindra Ramdas Petkar

Digitally signed by Ravindra Ramdas Petkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7faa8a0fe5f84a3356eee5e28943030f4417521c2e4121efd5e2b39c2eae27ce, serialNumber=93d05a1f2a6cead3ed9e358a4d06e909b2a25fe9a918a443e6204cd5d72b0ed9, cn=Ravindra Ramdas Petkar
Date: 2019.01.02 17:27:53 +05'30'

( र.रा.पेटकर )

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२. महालेखापाल-१ ( लेखा व अनुज्ञेयता ) ( लेखा परीक्षा ), मुंबई.
३. वित्त विभाग (अर्थसंकल्प-३), मंत्रालय ,मुंबई.
४.निवडनस्ती वित्त विभाग, संगणक कक्ष.